तालीम कुस्ती केंद्राचा विकास या योजनेंतर्गत पात्र संस्थेस आर्थिक सहाय्य देण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण ३०२३/प्र.क्र.४१/क्रीयुसे-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १४ जुलै, २०२३

वाचा:- १.शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. राक्रीधो-२०१२/प्र.क्र.२४४/क्रीयुसे-१, दि.१ मार्च २०१४.
२. आयुक्त क्रीडा व युवक सेवा , म.रा. पुणे यांचे पत्र क्र. ता.कुकेंवि/ अनुदान/शिफारस / २०२३-२०२४,का६/८५४९ दि.२१ मार्च २०२३

प्रस्तावना:-

राज्यातील कुस्ती कलेची परंपरा आधुनिक काळात कायम ठेवणाऱ्या जुन्या तालमी/ आखाडे यांना काळानुरुप अत्याधुनिक स्वरुप प्राप्त करुन देण्यासाठी आर्थिक सहाय्य उपलब्ध करुन देण्याच्या अनुषंगाने तसेच तालीम कुस्ती केंद्राच्या विकासाला चालना देण्याकरीता संबंधित संस्थांना अर्थसहाय्य देण्यासाठी संदर्भ क्रमांक १ येथील दि. ०१ मार्च, २०१४ च्या शासन निर्णयान्वये तालीम कुस्ती केंद्राचा विकास या योजनेस मान्यता देण्यात आली आहे. या अतंर्गत तालीम कुस्ती केंद्राच्या विकासासाठी विविध संस्थांना अनुदान मंजूर करण्याचा प्रस्ताव आयुक्त क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भाधीन क्रमांक २ येथील पत्रान्वये शासनास सादर केला आहे. सदर प्रस्तावास अनुसरुन तालीम कुस्तीच्या केंद्राच्या विकासासाठी संबंधित संस्थेस अर्थसहाय्य मंजूर करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :

संदर्भ क्र १ येथील शासन निर्णय दि.०१ मार्च,२०१४ मधील अटी व शर्तीच्या अधीन राहून खालील पात्र संस्थेस तालीम कुस्ती केंद्राचा विकास या अनुदान योजनेअंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

| अ.क्र | संस्थेचे नाव | कामाचे स्वरुप | अंदाजपत्रकीय किंमत | शासन निर्णय, दि. ०१ मार्च, २०१४ नुसार अनुज्ञेय प्रशासकीय मान्यतेची रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | ग्रामपंचायत, कवठे, ता. वाई जि. सातारा (स्थानिक स्वराज्य संस्था) | जुन्या तालमीची दुरुस्ती | रु ९.०० लक्ष. | रू.६.७५ लक्ष |

२. उपरोक्त मंजूर रक्कम सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी "मागणी क्र. ई-३ लेखाशिर्ष २२०४ क्रीडा व युवक सेवा १०४ क्रीडा व खेळ (०८) खेळ व खेळाडूंना सहाय्य (०८) (०३) तालीम कुस्ती केंद्राचा विकास (२२०४ ५४७५) ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षातंर्गत उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात येईल.

३. उपरोक्त संस्थेस संबंधीत वर्षातील अनुदानाच्या उपलब्धतेनुसार निधी उपलब्ध करून देण्यात येईल. याबाबतचा प्रस्ताव आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, म.रा., पुणे यांनी स्वतंत्रपणे शासनास सादर करावा. सदर प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर निधी वितरणाबाबत आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७१४१७१२४९२७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANSING ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=9651a3c25d5e1f106e47059f72760ff520f9b00f67c3e9186e40ed4bd4fbaee6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=41EC78BC14804BABDC24C7FD31BA9FBF63804F499D4335774E27423E40136397, cn=RANSING ANANDRAO DERE
Date: 2023.07.14 19:54:39 +05'30'

**( रणसिंग डेरे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे प्रधान सचिव,
२. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई यांचे खाजगी सचिव,
३. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय,
४. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
५. मा.विरोधी पक्षनेता,विधानसभा / विधानपरिषद, यांचे स्वीय सहायक, मुंबई.
६. मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. सर्व मा. विधानपरिषद/ विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
८. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे स्वीय सहाय्यक
९. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
११. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
१२. उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, कोल्हापूर विभाग, कोल्हापूर
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा
१४. जिल्हा क्रीडा अधिकारी, सातारा
१५. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६. निवड नस्ती (क्रीयुसे-१).